सातारा जिल्हा कारागृह येथे तारेचे कुंपण घालण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक- बीएलडी-०१२०/५/प्र.क्र.१०१/पीआरएस-२.
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक:- ५ जुलै,२००१.

पहा:- १) कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्रमांक- बीएलडी/साजिका/५०/कक्ष-३,दिनांक १.११.२०००.
२) वित्त विभाग,शासन निर्णय,क्र.विअप्र-१०९७/प्र.क्र.५०/९७/विनियम दिनांक ३.९.१९९९.

**शासन निर्णय:-** सातारा जिल्हा कारागृहाभोवती काटेरी तारेचे कुंपण बांधणेबाबतचा रु.१,५८,७५२/- चा प्रस्ताव कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी शासनास प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केला असून त्याच्या समर्थनार्थ त्यांनी नमूद केले आहे की, सातारा जिल्हा कारागृह हे शहराच्या मध्यवस्तीत असून तेथे नेहमी लोकांची ये-जा चालू असते. त्यामुळे कारागृहाच्या मालकीच्या जागेवर अतिक्रमण होऊ नये व कारागृहाची सुरक्षा व्यवस्था धोक्यात येऊ नये म्हणून त्या जागेच्याभोवती तारेचे कुंपण घालणे अत्यंत आवश्यक आहे. त्याकरिता शासनास प्रस्तावित केलेल्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता द्यावी अशी शासनास विनंती केली आहे.

२. कारागृह महानिरीक्षक यांनी शासनास सादर केलेल्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब कांही काळ शासनाच्या विचाराधीन होती. त्यावर शासनाने काळजीपूर्वक विचार करुन शासन या आदेशाद्वारे वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांक-.विअप्र-१०९७/प्र.क्र.५०/९७ /विनियम दिनांक ३.९.१९९९ अनुसार व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उप विभाग पाच तसेच महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकाअंतर्गत-१३४ परिच्छेदाखाली प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करुन व संबंधित विवरण पत्रातील रकाना ५ व ६ मधील अटींच्या अधिन राहून सातारा जिल्हा कारागृह येथे तारेचे संरक्षण कुंपण घालण्यासाठी येणारा खर्च रु.१,५८,७५२/- (रुपये एक लक्ष अठ्ठावण्ण हजार सातशे बावन्न फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) यापूर्वी प्रशासकीय मान्यता दिलेली कामे प्रथम हाती घेऊन नंतरच या कामास सुरुवात करण्यांत यावी.

२) सदर प्रस्तावाच्या खर्चाची आर्थिक तरतूद अर्थसंकल्पात झाल्याशिवाय या कामास सुरुवात करु नये.

३) यासाठी मंजूर झालेल्या अनुदानातूनच बांधकाम पूर्ण करण्यात यावे. त्यासाठी अतिरिक्त अनुदान मंजूर करण्यांत येणार नाही.

३. यासाठी होणारा खर्च "लेखाशिर्ष ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-१०१-बांधकाम,पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (तुरुंग)" मागणी क्रमांक-एच-१३ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा व सन २००१-२००२ या आर्थिक वर्षात मंजूर होणा-या अनुदानातून भागविण्यांत यावा.

५. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४८०/इमा-२, दिनांक १७.१.२००१ द्वारे मिळालेल्या मान्यतेने तसेच नियोजनविभाग व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.९४०१/सीआर-३७८/२००१/व्यय-८,दि.२८.६.२००१ च्या मान्यतेने निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सु.म.माने )
**कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन.**

प्रति,
कारागृह महानिरीक्षक ,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य,पुणे.
अधिक्षक,जिल्हा कारागृह,सातारा.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)मुंबई.
महालेखापाल ,महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा)मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी,सातारा.
वित्त विभाग (व्यय-८) मंत्रालय,मुंबई.
नियोजन विभाग (का.१४११) मंत्रालय,मुंबई.
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा.२) मंत्रालय,मुंबई.
उप अभियंता सार्वजनिक बांधकाम उपविभाग, सातारा,
अवर सचिव,गृह विभाग,बीयुडी-१,मंत्रालय,मुंबई.
निवडनस्ती.